**महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास परीक्षा अधिनियम तयार करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : व्हिओसी-२०२०/ प्र.क्र. ७३/व्यशि-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०२०.

वाचा:- संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. ०८/मराकौविपमं / अधिनियम/२०२०/३९, दि. ०४/०८/२०२०.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळाची स्थापना सन १९८६ मध्ये शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. मंडळाच्या स्थापनेचा मुळ उद्देश बेरोजगारांना रोजगार किंवा स्वयंरोजगार उपलब्ध करुन देणे असा आहे. याकरीता मंडळाद्वारे ६ महीने, १ वर्ष तसेच २ वर्षे मुदतीचे निविदा व्यावसायिक अभ्यासक्रम विविध शासकीय तसेच खाजगी संस्थाद्वारे स्वयं आर्थिक तत्वावर चालविते. मंडळाद्वारे अशा उमेदवारांची परीक्षा घेऊन, उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांना प्रमाणपत्र किंवा पदविका प्रदान केले जातात. त्याकरीता विविध संस्थांना मंडळाशी संलग्नीकरण करणे, अभ्यासक्रम चालविण्याकरीता परवानगी देणे, इत्यादी बाबी मंडळाद्वारे पार पाडल्या जातात तथापि शासनाच्या निर्देशनास असे आले आहे की, काही व्यवसाय अभ्यासक्रम चालविणाऱ्या संस्था मंडळाशी संलग्नता प्राप्त न करता परस्पर उमेदवारांना व्यावसायिक अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण देऊन स्वप्रमाणपत्र (Self Certification) देतात. अशा सर्व खाजगी संस्थांना महाराष्ट्र कौशल्य विकास परीक्षा मंडळासोबत नोंदणीकरण करुन उमेदवारांना मंडळाद्वारे तयार करुन प्रमाणपत्र देण्याकरीता या सर्व संस्थांना कायद्याच्या कक्षेत आणण्यासाठी मंडळाचा स्थापना अधिनियमद्वारे करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय :-

राज्य कौशल्य परीक्षा मंडळ अधिनियम तयार करण्याकरिता समिती गठीत करण्यास शासनाने मान्यता दिली असून समितीची रचना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम | |
|---|---|---|---|
| १ | श्री.दीपेंद्र सिंह कुशवाह | संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय | अध्यक्ष |
| २ | श्री. अनिल जाधव | सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय | सदस्य |
| ३ | श्री. कवी लुथरा | औद्योगिक क्षेत्राचे/संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | श्री. प्रकाश पागे | सनदी लेखापाल | सदस्य |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | श्री. डी.पी.गोमारे | निवृत्त सहसचिव, विधी व न्याय विभाग | सदस्य |
| ६ | श्री. विनोद बोंदरे | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सदस्य सचिव | सदस्य सचिव |

वरीलप्रमाणे गठीत करण्यात आलेल्या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१) राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळ अधिनियमाद्वारे स्थापन करण्याकरीता अधिनियम व आवश्यकतेप्रमाणे नियमांचे प्रारुप तयार करणे.

२) ६ महीने ते २ वर्षे या कालावधीतील कौशल्य विकास कोर्सेस चालविणाऱ्या संस्थांनी राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळाचे संलग्नीकरण प्राप्त करणे.

३) राज्यातील नामांकित संस्थांशी/ ट्रेनिंग प्रोवायडरशी राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळाने सामंजस्य करार करुन, त्यांचे कोर्सेसचे अभ्यासक्रम स्वीकारणे व ते अभ्यासक्रम इतर संस्थांना उपलब्ध करुन देणे.

४) राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळातर्फे डिप्लोमा, ॲडव्हान्स डिप्लोमा स्तराचे कोर्सेस चालविणे व प्रमाणपत्र प्रदान करणे.

५) नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणामध्ये नमूद केल्याप्रमाणे शालेय स्तरावर NSQF - aligned courses सुरु करणेबाबत राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळातर्फे मार्गदर्शन करणे, शैक्षणिक संस्थांना कौशल्य कोर्सेस स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरु करण्याकरिता संलग्नीकरण देणे, मूल्यमापन करणे व प्रमाणपत्र देणे.

महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास परीक्षा अधिनियम विधीमंडळ मध्ये संमत करून मा.राज्यपाल महोदयांच्या मान्यतेने निर्गमित करावयाच्या असल्याने वरील समितीने अधिनियम तयार करण्याकरिता आपला अहवाल शासनास १ महिन्याच्या कालावधीत आदेश निर्गमित झाल्यापासून सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८२७१७१०४१७४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.08.27 17:22:45 +05'30'

(डॉ. सुवर्णा खरात)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास परीक्षा मंडळ,वांद्रे,मुंबई.

३. सर्व संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
४. समितीतील सर्व सदस्य.
५. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती (व्यशि-४), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.